**शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील सहायक प्राध्यापक यांची सहयोगी प्राध्यापक पदावर व सहयोगी प्राध्यापक यांची प्राध्यापक पदावर कॅस योजनेंतर्गत स्थाननिश्चिती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/मशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक: १६ जुलै, २०२४.

**वाचा:**

१. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९ दि. ३०.०६.२०१०.
२. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण २०११(२५/११) विशि-१, दि. १५.०२.२०११.
३. विद्यापीठ अनुदान आयोगाचे पत्र क्र. एफ नं. १-७/२०१५ यु.II (१),दि.०८.११.२०१७.
४. केंद्र शासन मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. १-७/२०१५-यु II दि.(१), दि.०२.११.२०१७
५. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ १-२/२०१७(EC/PS), दि.१८.०७.२०१८.
६. केंद्र शासन मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. १-४/२०१७-यु.II, दि.२८.०१.२०१९.
७. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/विशि-१, दि.०८.०३.२०१९ व दि.१०.०५.२०१९.
८. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण-२३०९/प्र.क्र.१२८/विशि-१. दि.०५.०३.२०२४.
९. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं-२०२४/कॅस-०८/२०२४/प्रशा-१/३०२९, दि.०४.०६.२०२४

**शासन निर्णय :-** शासकीय महाविद्यालये/संस्था/अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना विद्यापीठ अनुदान आयोगाने अधिसूचना क्र.एफ ३.१/२००९ दि.३०.०६.२०१० अन्वये निकष विहित करुन सेवांतर्गत प्रगती योजना (Career Advancement Scheme) लागू केली आहे. सदर अधिसुचनेतील तरतूदी राज्यात शासन निर्णय दि.१५.०२.२०११ अन्वये लागू करण्यात आल्या आहेत. केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधिन क्रमांक ४ येथील दि.०२.११.२०१७ रोजीच्या पत्रान्वये विद्यापीठ तसेच महाविद्यालयातील शिक्षकीय पदांची वेतनश्रेणी ७ व्या वेतन आयोगानुसार सुधारित करणेबाबत सूचित केले आहे. विद्यपीठ अनुदान आयोगाने दि.१८.०७.२०१८ च्या अधिसूचनेन्वये सेवांतर्गत प्रगती योजना ( Career Advancement Scheme) लागू केली आहे. त्यानुसार राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना ७ व्या वेतन आयोगातील तरतुदी संदर्भाधिन क्र.७ येथील दि.०८.०३.२०१९ व दिनांक १०.०५.२०१९ अन्वये लागू करण्यात आलेल्या आहेत. तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाने दि.३०.०६.२०२३ व दि.३१.०७.२०२३ रोजीच्या अधिसूचनेन्वये

विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांमधील शिक्षकांच्या नियुक्तीसाठी किमान पात्रतेमध्ये केलेल्या सुधारणा राज्यातील अकृषी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांना शासन निर्णय दि.०५.०३.२०२४ अन्वये लागू केलेल्या आहेत.

२. राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक पदावर स्थाननिश्चिती करण्यासाठी शासन निर्णय दि.०७.०६.२०२१ अन्वये निवड समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि.३१.०५.२०२४ रोजीच्या बैठकीत समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेवून संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.९ येथील पत्रान्वये शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील सहायक प्राध्यापक यांची सहयोगी प्राध्यापक पदावर (AL१२ ते AL १३A) व सहयोगी प्राध्यापक यांची प्राध्यापक पदावर (AL१३A ते AL १४) पदावर स्थाननिश्चिती करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९, दि. ३०.०६.२०१० व अधिसूचना असाधारण, भाग-III विभाग-४, दि. १८.०७.२०१८ मधील सेवातंर्गत प्रगती योजनेतंर्गत (Career Advancement Scheme) स्थाननिश्चिती करणेसंदर्भातील तरतुदींची पुर्तता करणाऱ्या शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील सोबतच्या "प्रपत्र-अ" मध्ये दर्शविलेल्या सहयोगी प्राध्यापक यांना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून प्राध्यापक पदावर (AL१३A ते AL १४) मध्ये स्थाननिश्चिती करण्यास व "प्रपत्र-ब" मध्ये दर्शविलेल्या सहाय्यक प्राध्यापक यांना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून सहयोगी प्राध्यापक पदावर (AL१२ ते AL १३A) मध्ये स्थाननिश्चिती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सोबतच्या "प्रपत्र-अ" व "प्रपत्र-ब" मधील अध्यापकांची वेतन निश्चिती करण्याची कार्यवाही संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे करतील.

४. यासाठी येणारा खर्च, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक: संकीर्ण २०१८/प्र.क्र. ५६/विशि-१ दि.०८.०३.२०१९ मध्ये दर्शविलेल्या संबंधित अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखली खर्ची दर्शविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१६१५२९५८०८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.16 15:41:20 +05'30'

**(अशोक शं. मांडे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र:- प्रपत्र- "अ" व "ब"**

**प्रति,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई-नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर, अमरावती, नागपूर, बुलढाणा, बीड, अकोला व कोल्हापूर.
९. सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था (उच्च शिक्षण संचालनालयामार्फत)
१०. सर्व प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालये (उच्च शिक्षण संचालनालयामार्फत)
११. सर्व संबंधित सहाय्यक प्राध्यापक व सहयोगी प्राध्यापक (संबंधित प्राचार्य/संचालक यांच्या मार्फत).
१२. निवडनस्ती/ मशि-१

**प्रपत्र-अ**

(शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/मशि-१, दिनांक १६.०७.२०२४ सोबतचे)

(सेवांतर्गत प्रगती योजनेतंर्गत प्राध्यापक पदासाठी (AL-१३A ते AL-१४) मध्ये स्थाननिश्चती)

| अ. क्र. | सहयोगी प्राध्यापकाचे नाव | विषय | महाविद्यालय/संस्था/ अध्यापक महाविद्यालयाचे नाव्र | प्राध्यापक पदासाठी (AL१३ A ते AL१४) मध्ये स्थाननिश्चितीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ. किशोर सुखदेव जनबंधू | प्राणिशास्त्र | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| २ | डॉ. सुषमा लक्ष्मीकांत दामोदरे | भूगोल | वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| ३ | डॉ. मेघा मधुकर सावरकर | भूगोल | वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| ४ | डॉ. मंगेश एकनाथराव शेळके | रसायनशास्त्र | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती | ०१.०७.२०२४ |
| ५ | डॉ. अनिल देवराव वरघट | शिक्षणशास्त्र (इंग्रजी) | शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा | ०१.०७.२०२४ |
| ६ | डॉ. निलीमा अरविंद मोरे | शिक्षणशास्त्र (विज्ञान) | शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल | ०१.०७.२०२४ |
| ७ | डॉ. उर्मिला अतुल परळीकर | शिक्षणशास्त्र (इंग्रजी) | शासकीय अध्यापक महाविद्यालय, अंबाजोगाई | ०१.०७.२०२४ |
| ८ | डॉ. रामेश्वर शेकुभाऊ पदमे | शिक्षणशास्त्र (भूगोल) | शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर | ०१.०७.२०२४ |
| ९ | डॉ. लता शिवाजी पाटील | शिक्षणशास्त्र (इतिहास) | श्री म.ता.शा. अध्यापक महाविद्यालय, कोल्हापूर | ०१.०७.२०२४ |
| १० | डॉ. किर्तीमाला रामभाऊ गोपाल | वनस्पतीशास्त्र | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| ११ | डॉ. विरेंद्र आबाजी शेंडे | जीवशास्त्र | शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| १२ | डॉ. रचिता सुब्रत रथो | राज्यशास्त्र | शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई | ०१.०७.२०२४ |
| १३ | डॉ. माधुरी अनिल जोशी | हिंदी | इस्माईल युसुफ कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, मुंबई | ०१.०७.२०२४ |

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.16 15:41:38 +05'30'

**(अशोक शं.मांडे)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

## **प्रपत्र-ब**

(शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/मशि-१, दिनांक १६.०७.२०२४ सोबतचे)

(सेवांतर्गत प्रगती योजनेतंर्गत सहयोगी प्राध्यापक पदासाठी (AL-१२ ते AL-१३A) मध्ये स्थाननिश्चती)

| अ. क्र. | सहाय्यक प्राध्यपकाचे नाव | विषय | महाविद्यालय/संस्था/ अध्यापक महाविद्यालयाचे नाव | सहयोगी प्राध्यापक पदासाठी (AL-१२ ते AL-१३A) मध्ये स्थाननिश्चतीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ.सिमा संजीव मालेवार | भूगोल | वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| २ | श्री. सर्वेश्वर सत्यनारायणमूर्ती कासर्ला | भौतिकशास्त्र | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| ३ | डॉ. आशा मधुकरराव धारस्कर | शिक्षणशास्त्र (इतिहास) | शासकीय अध्यापक महाविद्यालय, अकोला | ०१.०७.२०२४ |
| ४ | डॉ. सुनिल दादाराव पुनवटकर | ग्रंथपाल | वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |
| ५ | डॉ. संजय नारायण कानिंदे | राज्यशास्त्र | वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर | ०१.०७.२०२४ |

ASHOK S
MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.16 15:41:49 +05'30'

( अशोक शं.मांडे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन